सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पूरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०६.१८/प्र.क्र. २३२/फ-१**
मंत्रायलय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ जानेवारी, २०१९.

वाचावे :-

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक :-०२.४.२०१८.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.२१/२०१६-१७/२०५/२०१८-१९, दिनांक :- १०.०५.२०१८.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/नबाप्र/चाबाप्र/प्र.क्र.३७४/२०१८-१९, दिनांक :- ०४.०६.२०१८.
४) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दिनांक २७.०७.२०१८.

**प्रस्तावना :-**

राज्यस्तरीय योजनेतंर्गत सन २०१८-१९ करीता राज्य जैवविविधता मंडळाची संख्याबळ वाढविणे (२४०६-८६९६) या लेखाशिर्षांतर्गत रुपये ३००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

२. सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये राज्य जैवविविधता मंडळाची संख्याबळ वाढविणे (२४०६-८६९६) या लेखाशीर्षा अंतर्गत माहे मार्च, २०१९ पर्यत ३,००० जैवविविधता व्यवस्थापन समितीं व ५०० लोक जैवविविधता नोंदवही तयार करण्यासाठी लागणारा रु. २०,०००/- प्रति जैवविविधता व्यवस्थापन समितीं व रु. ४०,०००/- प्रति जैवविविधता नोंदवही प्रमाणे रु. ८००.०० लक्ष निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ च्या शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार राज्य जैवविविधता मंडळाची संख्याबळ वाढविणे (२४०६-८६९६) या लेखाशिर्षांतर्गत मंजूर पुरवणी मागणी रु. ८००.०० लक्ष पैकी रुपये ५६०.०० लक्ष निधी वितरीत करण्याची अनुमती वित्त व नियोजन विभागाने दिलेली आहे.

**शासन निर्णय :-**

राज्य जैवविविधता मंडळाची संख्याबळ वाढविणे (२४०६-८६९६) या लेखाशीर्षा अंतर्गत सन २०१८ च्या पावासाळी अधिवेशनामध्ये पूरवणी मागणीद्वार मंजूर करण्यात आलेल्या रु. ८००.०० लक्षचा ७०% म्हणजेच रु. ५६०.०० लक्ष निधी जैवविविधता व्यवस्थापन समितीं व लोक जैवविविधता नोंदवही तयार करण्याकरिता खालील अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, १०१ (११) वनसंरक्षण, विकास व पुर्ननिर्मिती पंचवार्षिक योजना अंतर्गत राज्य योजना (११) (३६) महाराष्ट्र राज्य,

जैवविविधता मंडळ (२४०६-८६९६) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

२. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

३. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

४. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

५. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

६. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक - अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

७. सदरचा शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या अनौसं१८२/१४७५, दिनांक १३.१२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौसं ३६३/व्यय-१०, दिनांक २७.१२.२०१८ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१११५२३०९८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2019.01.11 15:32:09 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
**महसूल व वन विभाग**

**प्रति :**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य जैवविविधता मंडळ, नागपूर
५. महालेखापाल १ व २ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
६. निवड नस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई ३२.